राष्ट्रीय आरोग्य अभियान सन २०२२-२३ व २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी प्रकल्प अंमलबजावणी आराखडयामध्ये मंजुर झालेल्या निधीतुन विविध प्रकारच्या छापाईस प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२३/प्र.क्र.१४१/आरोग्य-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ३० मार्च, २०२३ .

**वाचा :-**

(१) अतिरिक्त संचालक पुणे ,कल्याण व माता बालसंगोपन कार्यालय कुटुंब ,आरोग्य सेवा ,यांचे पत्र क्र. राकुकका/खरेदी २०२२-२४/कक्ष १५/छपाई/७०६१-६३/२०२३ दि.०७/०२/२०२३.

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत RMNCHA+A कार्यक्रमांतर्गत सन २०२२-२३ व २०२३-२४ या दोन वर्षाकरिता प्रकल्प अंमलबजावणी आराखडयामध्ये राज्यातील विविध आरोग्य संस्थांमधील रुग्णांच्या नोंदी व सेवांची नोंद ठेवण्यासाठी आवश्यक असलेल्या लेबर केस शिट, लेबर रुम रजिस्टर, सेफ सर्जीकल चेकलिस्ट, रेफरल इन / आऊट रजिस्टर, कनसेंट फार्म, एमसीपी कार्ड, व्हॅक्सीन रजिस्टर, आर-३ रजिस्टर, सीडीआर फॉरमॅट, एचबीकेएमसी कार्ड, सेफ मदरहुड बुकलेट, पेंशन्ट सॅटिसफॅक्शन रजिस्टर, MPCDSR Format, AMB card, Service Provision register, Stock register, PE-kit, कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया रजिस्टर, Adolescent Friendly Health Clinics service register, WIFS card, RBSK Card, इ. विविध प्रकारची प्रसिध्दी पत्रके तसेच नोंदवहया इ. छपाई करण्यासाठी रु.३००८.५२ लक्ष इतका निधी मंजुर करण्यात आलेला आहे. सदर निधीपैकी रु.२४२१.०७ लक्ष इतक्या खर्चाच्या छपाईच्या विविध बाबींस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत RMNCHA+A कार्यक्रमांतर्गत सन २०२२-२३ व २०२३-२४ या दोन वर्षाकरिता राज्यातील विविध आरोग्य संस्थामधील रुग्णांच्या सेवाविषयक नोंदी ठेवण्यासाठी आवश्यक असलेल्या विहित नमुन्यातील विविध प्रकारच्या नोंदवहया तसेच प्रसिध्दी पत्रकांची छपाई करण्यासाठी रु.३००८.५२ लक्ष इतका निधी मंजुर करण्यात आलेला आहे. सदर निधीतुन रु.२४२१.०७ लक्ष इतक्या खर्चाच्या पुढील विवरणपत्रात नमुद केल्यानुसार रु.२४२१.०७ लक्ष इतक्या खर्चाच्या छपाईच्या विविध बाबींस त्या खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यास हरकत नसावी.

Rs. In Lakhs

| Programme/ Theme | S.No. | Scheme/ Activity | Objective of exp. Area included (Enter each area in separate row) | No of untis | Budget 2022.23 | Budget 2023.24 | Total Approved FY 2022-24 | Total Printing Proposal |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| MH | 17 | **Other MH Components** | **Printing Labour case sheet, safe surgical cneck list, dos and don't booklet, labour room register, patient satisfaction survey format, referral in and out register, consent form and safe motherhood booklet** | **7171290** | **406.8** | **406.8** | **813.6** | **813.6** |
| | 17 | **Other MH Components** | **Pre-conception<br>Old districts - 10 - (Gadchiroli , Washim ,Osmanbad , Nandurbar, Palghar, Nashik, Yavatmal, Gondia, Amarawati (Melghat) and Chandrapur - No budget requierd<br>New 8 districts (Thane, Raigad, Pune, Jalgaon, Ahamadnagar, Dhule, Nanded and Nagpur)<br>Rs. 26 Lakh / dist for printing<br>Total 52 Lakhs / dist** | **833486** | **208** | | **208** | **173.61** |
| **RBSK** | **21** | **Rashtriya Bal Swasthya Karyakram (RBSK)** | **Printing of RBSK card - one card per benificiary (20% cards in 2023-24)** | **3920000** | | **117.6** | **117.6** | **117.6** |
| **Child Health** | **23** | **Community Based Care - HBNC & HBYC** | **Printing of HB-KMC card to be given to benificiary by ASHA** | **386892** | **15.7892** | **22.9004** | **38.6896** | **38.69** |
| | **25** | **Child Death Review** | **Printing of CDR formats** | **780247** | **25** | **25** | **50** | **47.86** |
| | **31** | **State specific Initiatives and Innovations** | **Special action to reduce IMR in 40 identified high mortality blocks. Interventions include use of injection FCM, additional benefits to ASHA for ESB, KMC at facility and home, capacity building of staff on justational age estimation, monitoring of high risk ANC, etc** | **10000** | **5** | **5** | **10** | **10** |
| | **52** | **Anaemia Mukt Bharat** | **Printing of compliance cards - benificiaries** | **18239897** | **136** | **136** | **272** | **272** |
| **Immunization** | **32** | **Immunization including Mission Indradhanush** | **Printing of MCP card, vaccine register, tally sheet, montoring format** | **2705330** | **420.57** | | **420.57** | **420.57** |
| **RKSK** | **35** | **Adolescent Friendly Health Clinics** | **Printing for Adolescent Friendly Health Clinic - Printing of registers - 4 types, formats, cards, and IEC for model Clinic and Printing of Manual etc** | **1708368** | **29.12** | **30.54** | **59.66** | **59.66** |
| | **36** | **Weekly Iron Folic Supplement (WIFS)** | **Printing under WIFS - Card** | **3341228** | **33.41** | **33.41** | **66.82** | **66.82** |
| | **38** | **Peer Educator Programme** | **Printing of PE kits and PE diary** | **181986** | **162.84** | **162.84** | **325.68** | **325.68** |
| **FW** | **50** | **Other Family Planning Components** | **Printing - R-3 registers (7138 - Rs. 350/-) For all health facilities** | **563938** | **24.98** | **50** | **74.98** | **74.98** |
| | | | | | **1467.51** | **990.09** | **2457.60** | **2421.07** |

(१) सदर विविध प्रकारच्या छपाईची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी त्यानंतरच सदर बाबीच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी. सदर प्रक्रिया खरेदी सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांच्या स्तरावर करण्यात यावी.

(२) सदरहू छपाई खरेदी गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. छपाई खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञानी (तांत्रिक समिती/अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, छपाई खरेदी ही कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केली नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच छपाई खरेदीची प्रक्रीया राबविण्यात यावी

(३) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे GEM Portal, इतर राज्यांचे दरकरार खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे. त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

(४) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/ पुरवठानंतर नमुना तपासणी (Pre/Post-dispatch: random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (Specification) असलेल्या वस्तुचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

(५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करून सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी

(६) सदरहू खरेदी प्रक्रियेसाठी होणारा खर्च केंद्र शासनाने सन २०२२-२३ व २०२३-२४ साठी मंजुर केलेल्या प्रकल्प अंमलबजावणी आराखडयामध्ये रु.३००८.५२ लक्ष निधीतुन करण्यात यावा.

(७) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

(८) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्र शासनाच्या कृती आराखड्यातील मार्गदर्शक सूचनांचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

(९) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

त्याचप्रमाणे, सदर सर्विसेस बाह्य यंत्रणेकडून घेण्याकरीता वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक ०२.०२.२०१३, दिनांक ०२.१२.२०१३, दिनांक ०२.०८.२०१६ व दिनांक २७.०४.२०२२ मधील तरतुदीचे व शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय व मार्गदर्शक सूचना यांची पूर्तता होईल, याचीही खात्री करण्यात यावी.

(१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/ भाग २ /२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग. पहिला उपविभाग दोन मधील अ.क्र. ४ नियम क्रमांक-१९ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अटीची पूर्तता करण्यात यावी.

(११) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत. सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी -२०१६/प्र.क.२४०/आरोग्य-८, दिनांक २६ जुलै, २०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

०४. उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटीची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा, आयुक्तालय, मुंबई, अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण व माता बालसंगोपन कार्यालय, पुणे व सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांची राहील

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२११८१६०१५६१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA VITTHAL KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2023.03.30 12:18:39 +05'30'

**( राजेंद्र वि. कुडले)**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई.
३) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४) संचालक १ व २, आरोग्य सेवा, मुंबई व पुणे.
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई
६) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
७) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
८) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
९) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
१०) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
११) निवडनस्ती (आरोग्य-७)